शिधापत्रिका व्यवस्थापन प्रणाली (RCMS) वरील Public Login मार्फत ऑनलाईन शिधापत्रिकाविषयक अर्ज करतांना उद्भवणाऱ्या समस्यांचे निराकरण करण्याकरिता मार्गदर्शक Module

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.१०७/संगणक कक्ष**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दि. २० डिसेंबर, २०२३

**संदर्भ :-**

१. शासन निर्णय क्र.साविबा २०१५/प्र.क्र.२०/सं.क., दि.१८/५/२०१६
२. शासन निर्णय क्र.शिवाप २०२१/प्र.क्र.१९/नापु-२८, दि.१६/५/२०२३

**<u>शासन परिपत्रक</u>**

मा.सर्वोच्च न्यायालयाने रिट पिटीशन (सिव्हील) क्र.१९६/२००१ मध्ये दि.१४/९/२०११ रोजी लक्ष्य निर्धारित सार्वजनिक वितरण व्यवस्थेचे End to End Computerization बाबत विस्तृत आदेश दिले आहे. त्याअनुषंगाने केंद्र शासनाने दिलेल्या निर्देशानुसार NIC दिल्लीच्या Common Application Software (CAS) द्वारे राज्यातील सार्वजनिक वितरण व्यवस्थेच्या संगणकीकरणाचा Mission Mode प्रकल्प राबविण्यात येत आहे. सदर प्रकल्पात लाभार्थी कुटुंबाला संगणकीकृत शिधापत्रिका देणे या बाबीचा समावेश आहे. त्यास अनुसरुन शिधापत्रिका व्यवस्थापन प्रणालीमार्फत (RCMS) राष्ट्रीय अन्नसुरक्षा योजनेच्या लाभार्थ्यांकरिता QR Code आधारित ई-शिधापत्रिका ऑनलाईन तसेच डाऊनलोड करण्याची सुविधा उपलब्ध करुन देण्यात आली आहे. अंत्योदय अन्न शिधापत्रिका (AAY), प्राधान्य कुटुंब योजना (PHH) व राज्य योजनेअंतर्गत APL Farmer, राष्ट्रीय अन्न सुरक्षा योजना (NPH) अशा सर्व शिधापत्रिकाधारक लाभार्थ्यांस संदर्भाधीन शासन निर्णय, दि.१६ मे, २०२३ अन्वये ई-शिधापत्रिका सुविधा विनामुल्य उपलब्ध करुन देण्यात आलेली आहे.

२. राज्यातील नागरीकांना नवीन शिधापत्रिकेकरिता अर्ज करणे, शिधापत्रिकेतील पत्त्यामध्ये बदल करणे, नाव वगळणे किंवा समाविष्ट करणे अशा शिधापत्रिकाविषयक अनेक प्रकारच्या सेवा ऑनलाईन शिधापत्रिका व्यवस्थापन प्रणालीमार्फत Public Login वर उपलब्ध करुन देण्यात आल्या आहेत. तथापि, सदर Public Login सुविधेचा वापर करताना लाभार्थ्यांना विविध अडचणी येत असल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. सदर अडचणी दूर करण्याकरिता शिधापत्रिका व्यवस्थापन प्रणाली (RCMS) च्या वापराबाबत मार्गदर्शन करण्यासाठी Module तयार करण्यात आले असून परिपत्रकासोबत जोडण्यात आले आहे. सदर Module द्वारे RCMS प्रणालीमध्ये उपलब्ध करण्यात आलेल्या विशिष्ट सेवांचा वापर करण्याची कार्यपद्धती या परिपत्रकासोबत जोडलेल्या परिशिष्ट-“अ” मध्ये नमूद करण्यात आली आहे. नागरिकांना शिधापत्रिका व्यवस्थापन प्रणाली (RCMS) वरील Public Login सुविधेचा वापर करतांना काही समस्या असल्यास त्यांनी या मार्गदर्शक Module चा वापर करावा. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी / अन्नधान्य वितरण अधिकारी / उपनियंत्रक शिधावाटप यांनी सदर मार्गदर्शक Module कार्यालयात दर्शनी भागावर लावावे.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३१२२०१६५०३७८५०६ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

NETRA PRASHANT MANKAME

Digitally signed by NETRA PRASHANT MANKAME
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=19e4a6ac471ded0614da7ea31c20099ea471d8436dcf49faa3c0b2e0638732c3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C3DA775EEDF3E67170F45DF66F5DEAC516C0B0AB689DA4176D3BEBB60CCAD385, cn=NETRA PRASHANT MANKAME
Date: 2023.12.20 16:51:38 +05'30'

**( नेत्रा मानकामे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४. मा.मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
५. मा.सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई ३२
७. सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८. सर्व प्रशासकीय विभागाचे सचिव
९. सर्व विभागीय आयुक्त
१०. नियंत्रक (शिधावाटप) व संचालक नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई
११. सर्व जिल्हाधिकारी
१२. सर्व उप आयुक्त (पुरवठा)
१३. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी,
१४. सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी
१५. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
१६. उप संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई
१७. सर्व उप सचिव / अवर सचिव / सर्व अधिकारी, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१९. सर्व विधान परिषद सदस्य व विधान सभा सदस्य
२०. सर्व विरोधी पक्षनेते
२१. निवड नस्ती (संगणक कक्ष)

## परिशिष्ट – अ

# ई–शिधापत्रिका

**सर्व नागरीकांनी नवीन शिधापत्रिका/ दुय्यम शिधापत्रिका / शिधापत्रिकेत नवीन सदस्य वाढवणे, कमी करण्यासाठी खालील प्रमाणे ऑनलाईन पध्दतीने अर्ज सादर करावा.**

https://rcms.mahafood.gov.in — Google वर या संकेत स्थळाला भेट द्यावी.




| | |
|---|---|
| Sing in/Register/Public login | यावर क्लिक करावे. |
| ⬇ | |
| New user!signup Here | नवीन रेशन कार्ड तयार करण्यासाठी खाते तयार करा. |
| ⬇ | |
| I Want to apply for New Ration card<br>I have a valid Ration Card & I am a Hof/HofN<br>I have a valid Ration Card & I am a Member other than Hof/HofN | यावर क्लिक करुन आधार क्रमांक वरील आधारे सर्व माहिती भरून OTP आधारे नवीन खाते तयार करुन घ्यावे. (मोबाईल क्रमांक आधार कार्डशी लिंक असावा.) |
| ⬇ | |
| Registerd user | वरील प्रमाणे Registration पूर्ण झाल्यानंतर यावर क्लिक करावे. क्लिककेल्यानंतर आधार क्रमांक अथवा username / Password आधारे लॉगीन करा. |
| ⬇ | |
| New | वरील प्रमाणे लॉगीन केल्यानंतर Dashboard वरील डाव्या बाजूला New यावर क्लिक करून नवीन रेशन कार्ड तयार करण्यासाठी गावाचे नांव निवडावे व त्यानंतर कूटूंबातील सदस्य याची माहिती आधार कार्ड वरील माहिती प्रमाणेच भरावी. यामध्ये दिलेला सर्व तपशील भरावा विहीत ठिकाणी उत्पन्न प्रमाणपत्र, जात प्रमाणपत्र व जन्म तारखेचा पूरावा अपलोड करावा. या प्रमाणे कुटुंबातील सर्व सदस्य यांचा समावेश करावा. |
| ⬇ | |
| Card Type Details | कुटुबातील सर्व सदस्य समावेश झाल्यानंतर रेशन कार्ड ची योजना निवडावी |
| ⬇ | |
| Gas & Kerosene Oil details. | या बाबत सर्व माहिती भरावी. |
| ⬇ | |
| Attached Enclosures | यामध्ये Identity Proof Address Proof व Other यामध्ये पुरावे जोडावेत व ते नमुद करावे (Note* : File Type: PDF, File Size:0-200 kb) |
| ⬇ | |
| NFSA Criteria | यामध्ये अर्जदाराचे कुटूंब कोणत्या योजनेखाली येते याबाबत माहिती नमुद करावी व ती योजना निवडावी सोबत उत्पन्ना बाबतचा पुरावा जोडावा (Note* : File Type: PDF, File Size:0-200 kb) |
| ⬇ | |
| FPS Details | या मध्ये अर्जदार हे यांना हवे असलेले रेशन दुकान निवडावे. |
| ⬇ | |
| Submit Ration Card for verification and approval | या बटनवर क्लिक केल्यातनंतर आपले रेशन कार्ड मंजूरीसाठी तहसिल कार्यालयाकडे प्राप्त होईल. |




**रेशन कार्ड प्रस्ताव तहसिल कार्यालयाकडे ऑनलाईन सादर झाल्या नंतर अर्जदार आपल्या अर्जाची स्थिती तपासण्यासाठी आपले रेशन कार्ड चे लॉगीन आयडी वापरून अर्जाची स्थिती तपासू शकतात व रेशन कार्ड मंजूर झाल्या नंतर अर्जदार यांनी प्रधिकृत अधिकारी यांचे डीजीटल स्वागक्षरीचे ई रेशन कार्ड डाऊनलोड करावे.**

RCMS प्रणालीअंतर्गत Public Login मध्ये उपलब्ध करण्यात आलेल्या सेवांचा लाभ घेण्यासाठी कार्यपद्धतीबाबतचे मार्गदर्शक Module

------------------------------------------------------------------------------------------

१. नागरीकांनी शिधापत्रिका विषयक सेवांकरीता ऑनलाईन अर्ज करण्यासाठी खालील लिंक वर जावे.
https://rcms.mahafood.gov.in/
शिधापत्रिका व्यवस्थापन प्रणाली (RCMS) चे मुखपृष्ठ:




२. Sign In/Register या menu अंतर्गत Public Login हा submenu या लिंकवर जावे.




३. Public login हि विंडो उघडल्यानंतर खालीलप्रमाणे दोन पर्याय दिसतील:

a. Registered User (यापुर्वीच नोंदणी केलेल्या नागरीकांनी या पर्यायाचा वापर करावा)
b. New User! Sign Up Here (नवीन नोंदणी करण्यासाठी या पर्यायाचा वापर करावा)



४. **नवीन नोंदणी करण्याकरीता खालीलप्रमाणे पर्याय आहेत:**

a. A User having Valid Ration Card & is a HoF/HoFN (१२ अंकी शिधापत्रिका क्रमांक व कुटुंब प्रमुख असलेल्या लाभार्थ्यांनी हा पर्याय वापरावा)

b. A User having Valid Ration Card & is not a HoF/HoFN(१२ अंकी शिधापत्रिका क्रमांक व कुटुंब प्रमुख  नसलेल्या लाभार्थ्यांनी हा पर्याय वापरावा)

c. A New user to the system doesn्t have Ration Card (शिधापत्रिका नसलेल्या नागरीकांनी नवीन नोंदणी करीता हा पर्याय वापरावा )

a. **A User having Valid Ration Card & is a HoF/HoFN – १२ अंकी शिधापत्रिका क्रमांक व कुटुंब प्रमुख असलेल्या लाभार्थ्यांनी हा पर्याय निवडल्यानंतर नागरीकांनी १२ अंकी शिधापत्रिका क्रमांक नमूद करावा.** (A User having Valid Ration Card & is a HoF/HoFN should enter १२ digit Ration Card number)




b. **A User having Valid Ration Card & is not a HoF/HoFN –** १२ अंकी शिधापत्रिका क्रमांक व कुटुंब प्रमुख नसलेल्या लाभार्थ्यांनी हा पर्याय निवडल्यानंतर १२ अंकी शिधापत्रिका क्रमांक व आपला आधार क्रमांक नमूद करावा. (A User having Valid Ration Card & is not a HoF/HoFN should enter १२ digit Ration Card number and Aadhar number)



c. A New user to the system doesn’t have Ration Card

(शिधापत्रिका नसलेल्या नागरीकांनी नवीन नोंदणी करीता हा पर्याय निवडल्यानंतर नवीन लॉगीन तयार करण्याकरीता सर्व आवश्यक माहिती भरावी.)

(All necessary details has to be fill up for creation of login to apply for New Ration Card.)




५. सदर नमूद फॉर्म यशस्वी भरल्यानंतर आपल्या आधार कार्डसोबत संलग्न मोबाईल क्रमांकावर OTP येईल.

(After successful submission of the form an OTP will be send to the mobile number registered against Aadhaar Card/Aadhaar Number.)



OK बटणावर क्लिक केल्यानंतर नोंदणीकृत मोबाईल क्रमांकावर OTP पाठविण्यात येईल.
(After Clicking on OK the OTP will be sent to the registered number. )




६. यापूर्वीच्या फॉर्म सोबतच आता OTP भरण्याकरिता नव्याने एक रकाना दिसेल. हे वापरकर्त्याची पुष्टी करेल व आधार पडताळणी प्रक्रियेद्वारे तपशिल पडताळला जाईल. यासोबतच नवीन वापरकर्ता नोंदणी पूर्ण होईल. (In addition to the previous form one more field will be visible to enter OTP. It will confirm the user & the details were verified through this Aadhaar verification process & the application will be completed for new user login creation.)






७. नवीन नोंदणी केल्यानंतर self service प्रणाली मध्ये आपण प्रवेश करु शकता.

(After creation of login you will be able to login to the system for self service )

Homepage वर जाऊन Public Login मधून Sign In/Registerनिवडा.

(Go to Homepage & select Public Login from Sign In/Register)




आता नोंदणी झाली असल्याने आपण Registered User हा पर्याय निवडू शकतो.

(Now the login is already created so this time we॰ll click on Registered User button)



८. नोंदणीकृत वापरकर्ता पुढील तीन पद्धतीने या system मध्ये login करु शकतो.

(The Registered User can login to the system by ३ options)

I. **Login with Aadhaar OTP (आधार OTP द्वारे लॉगीन )** – या पद्धतीमध्ये आपला आधार क्रमांक व संबंधित Captcha लिहून Get OTP हा पर्याय निवडावा. (In this option user requires to enter his/her Aadhaar number & Captcha first then click on Get OTP)

II. **Login with User Name (युझर नेम द्वारे लॉगीन)** – या पद्धतीमध्ये आपले युझर नेम, पासवर्ड व संबंधित Captcha लिहून Get OTP हा पर्याय निवडावा. (In this option user requires to enter his/her User Name & Password (which you get at the time of registration) also enter Captcha then click on Get OTP)

III. **Login with 12 digit Ration Card number (१२ अंकी शिधापत्रिका क्रमांकाद्वारे लॉगीन)** – या पद्धतीमध्ये १२ अंकी शिधापत्रिका क्रमांक व Captcha लिहून Get OTP हा पर्याय निवडावा. (In this option user requires to enter his/her12 digit Ration Card number and enter Captcha first then click on Get OTP )




९. ओटीपी प्राप्त झाल्यानंतर वापरकर्त्याने ओटीपी नोंदवून Verify OTP हा पर्याय निवडावा. ओटीपी योग्य असल्यास वापरकर्त्यास system मध्ये प्रवेश मिळतो, ओटीपी अयोग्य असल्यास Resend OTP button वर क्लिक करावे. (Once the OTP is received user needs to enter the OTP & click on Verify OTP button. For correct OTP, user gets login to the system while for incorrect OTP he/she can click on Resend OTP button.)



१०. नागरिकांकरिता डॅशबोर्ड : (Dashboard of Public User)




वापरकर्ता त्याच्या / तीच्या अर्जाची सद्यस्थिती, रास्तभाव दुकानासंदर्भातील माहिती डॅशबोर्ड वरुन तपासणी करु शकता. (User can check his/her applications status, FPS Details from Dashboard)




| S.No. | Application No. | HoF Name | Father's Name | Scheme Name | Application Status | Date Of Application | Requested By | Action |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | N | | | Not Available [ ] | Application Deleted [LN] | 12/11/2021 15:20:23 | Operator | View |
| 2 | N | | | Not Available [ ] | Application Deleted [LN] | 16/01/2019 14:51:29 | Operator | View |
| 3 | N | | | Not Available [ ] | Application Deleted [LN] | 26/12/2018 17:10:33 | Operator | View |
| 4 | N | | | Not Available [ ] | Application Deleted [LN] | 28/07/2017 15:22:10 | Operator | View |

११. **ज्या लाभार्थ्यांना नवीन शिधापत्रिकेसाठी अर्ज / शिधापत्रिकेमध्ये दुरुस्ती करावयाची आहे त्यांनी बाजूच्या यादीमधून Apply/Edit Ration Card Application हा पर्याय निवडावा.**

(User who wants to apply / edit Ration Card details, please click on side menu select Apply/Edit Ration Card Application)

११.१ खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे जिल्हा/ तालुका व गाव निवडावे. (Please select District,Taluka & Villege)



११.२ खालील तक्त्यात कुटुंबातील सदस्यांचा तपशिल भरावा. प्रथम सदस्य हा शिधापत्रिकेचा कुटुंबप्रमुख असेल. ( Please fill family details also note that first member should be head of family)







११.३ खाली नमूद केल्याप्रमाणे सर्व माहिती भरावी. “ * ” चिन्हांकित माहिती भरणे अत्यावश्यक आहे.

(Please fill the below details. Note that “ * ” marked fields are compulsory to filled.)









११.४ कुटुंबाच्या उत्पन्नानुसार शिधापत्रिकेचा प्रकार निवडावा. (Select card type as per family income.)



११.५ रहवाशी पत्ता व गॅस कनेक्शनचा तपशिल भरावा. (Please fill the address & Gas connection details)









११.६ ओळखीचा पुरावा व रहवासी पुरावा जोडावा.

(Please attach identity and address proof )










११.७ अर्जदाराने शिधापत्रिकेचा प्रकार निवडावा. (Please select applicant fall under which category)



११.८ ज्या रास्तभाव  दुकानामधून शिधापत्रिका हवी आहे त्याबाबतचा तपशिल भरावा. (Fill the details For FPS mapping )







११.९ शिधापत्रिका अर्ज तपासणी व मान्यतेकरिता पाठविण्यापुर्वी सदर अर्ज जतन (Save) करावा. **कृपया लक्षात घ्या की, अर्ज तपासणी व मान्यतेकरिता पाठविल्यानंतर सदर अर्जात कोणताही बदल करता येणार नाही.** (Before submission for verification and approval, save the Ration Card details. Please note that, once application submitted for verification and approval, Ration Card details will not be able for editing and modifications.)



११.१० अर्ज यशस्वीरित्या स्विकृत झाला असून अर्जाची प्रत आपल्या नोंदणीकृत ई-मेल वर पाठविण्यात आली आहे. (Ration Card application has been successfully submitted and application copy send to your registered e-mail.)




## १२. Payment window

१२.१ NPH आणि APL शुभ्र करिता खालीलप्रमाणे विंडो दिसेल.

(Payment window for Scheme NPH and APL White )




१२.२ पेमेंटसाठी पुढे जा असे निवडल्यास खालील प्रक्रिया प्रदर्शित होईल

(If selected Proceed for Payment then below process displayed)









१२.३ योग्य पर्याय निवडा आणि पेमेंट करा

(Select appropriate option and do the payment)




अर्जदाराने पेमेंट प्रक्रिया पूर्ण केल्यानंतर त्याबाबतची माहिती २ दिवसांनी अद्ययावत होईल. (तांत्रिक अडचणअसल्यास दोन दिवसांपेक्षा अधिक कालावधी लागण्याची शक्यता आहे. (After completion of payment process, payment status will reflect in two days. (If any technical issue arrives it may take more than two days.)

१२.४ पेमेंट यशस्वीरित्या पूर्ण झाल्यानंतर अ.क्र.१० येथील डॅशबोर्ड मध्ये नमूद ॲप्लीकेशन रिक्वेस्ट येथे क्लिक करुन शिधापत्रिका अर्जाचे स्टेटस Save as Draft ऐवजी Send for modification and verification असे दर्शविण्यात येईल.

(After successfully completion of payment process click on Application Request Tab shown in dashboard window as per point no.१३ . Now your application status will change from "Save as Draft" to "Send for modification and verification".)

१२.५ पेमेंट यशस्वीरित्या पूर्ण झाल्याचे दर्शवित असून देखील काही वेळेस शिधापत्रिका पेमेंट पेंडिंग दिसत असल्यास Ration Card Payment येथे क्लिक करुन Get GRN व Get CIN या टॅब वर क्लिक करावे.

(After successfully completion of payment process, if pending payment issue arise please click on Ration Card Payment Tab and complete Get GRN & Get CIN process.)






१३.　　अर्ज पेमेंट रद्द करायचे असल्यास, नंतर reject बटणावर क्लिक करा आणि पुढे जा.

(If want to cancel application payment, then click on reject button and proceed.)






## १४. शिधापत्रिकेची प्रत प्राप्त करुन घेण्याबाबत (To download Ration Card)

१४.१ शिधापत्रिकेबाबतची कार्यवाही पूर्ण झाल्यानंतर शिधापत्रिकेची प्रत प्राप्त करुन घेण्यासाठी Download Your Ration Card या ऑप्शन वर क्लिक करावे. (After completion due process, Click on **Download Your Ration Card** to get your Ration Card copy.)




१४.२ Download Your Ration Card या ऑप्शन वर क्लिक केल्यानंतर तुमच्या नोंदणीकृत मोबाईल क्रमांकावर ओटीपी पाठविण्यात येईल. सदर ओटीपी नमूद करुन Verify OTP वर क्लिक करावे. (You will get OTP on your registered mobile number. Mention it and click on **Verify OTP** )






१४.३ तद्नंतर, पुढीलप्रमाणे ऑनलाईन शिधापत्रिका आपणांस उपलब्ध होईल.

(You will get online Ration Card like shown in this picture.)

**GOVERNMENT OF MAHARASHTRA**

**महाराष्ट्र शासन**

महाराष्ट्र शासन

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**Head of the family/कुटुंब प्रमुखाचे नाव:** [redacted]

**Address/संपूर्ण पत्ता:** [redacted] TAHSIL:

[redacted] , DISTRICT: [redacted] PIN CODE:

**FPS No./रास्तभाव / अ. शि. दुकान क्रमांक:** [redacted]

**FPS Name & Address/रास्तभाव / अ. शि. दुकान नाव आणि पत्ता:** [redacted]

**Kerosene oil Dealer No./केरोसिन तेल विक्रेता दुकान क्रमांक:**

**Kerosene oil Dealer Name & Address/केरोसिन तेल विक्रेता दुकान नाव आणि पत्ता:**

**Ration Card No./शिधापत्रिका क्रमांक.:** [redacted]

**Scheme Name/शिधापत्रिका योजनेचे नाव:** ANTYODAYA ANNA YOJANA

| S.No. /अ.क्र. | Member Name/शिधापत्रिका सदस्याचे नाव | Relation/कुटुंब प्रमुखाशी नाते | Caste/ जाति | Gender /लिंग | Age /वय |
|---|---|---|---|---|---|
| 1 | J [redacted] :E/जि [redacted] ₹ (HoF) (HoFN)* | SELF/स्वत: | [redacted] | [redacted] | 31 |

**No. of Units/युनिट्सची संख्या:** 1; **Adults/प्रौढ:** 1; **Children/मुले:** 0

**RC Status/शिधापत्रिका स्थिती:** Verified and Approved(A) **Date of Issue/शिधापत्रिका दिल्याची तारीख:** 04/07/2023

**Date of Printing:** 20/12/2023 1:11:03 PM

**Printed by:** [redacted]

e-signed by [redacted]

[redacted]

Signature of Issuing Authority
[Office seal]

**Terms & conditions/ अटी व शर्ती :**

1. As per the Section 3 of the NFSA Act 2013, the entitlements for AAY and PHH and rates for food-grains are given below/राष्ट्रीय अन्न सुरक्षा अधिनियम, २०१३ मधील कलम-३ नुसार अंत्योदय अन्न योजना आणि प्राधान्य कुटुंब योजनेसाठीचे देय धान्य व त्यांचे दर खालीलप्रमाणे आहेत:

| | |
|---|---|
| AAY (35 kgs per card)/अंत्योदय अन्न योजना -प्रति शिधापत्रिका ३५ किलो. | PHH (5 kgs per member)/प्राधान्य कुटुंब योजना-प्रति सदस्य ५ किलो. |
| Wheat @ Rs. 2 per kg & Rice @ Rs. 3 per kg/गहू रु. २/-प्रति किलो व तांदूळ रु. ३/-प्रति किलो. | Wheat @ Rs. 2 per kg & Rice @ Rs. 3 per kg/गहू रु. २/-प्रति किलो व तांदूळ रु. ३/-प्रति किलो. |

2. One family can have only one Ration Card and it is not transferable/एका कुटुंबाकरिता केवळ एक शिधापत्रिका देण्यात येईल व शिधापत्रिकेचे हस्तांतरण करता येणार नाही.
3. In case of, Change of Residential address, the card holder has to immediately intimate the Rationing Inspector/Supply office/रहिवासाच्या पत्त्यात बदल झाल्यास, शिधापत्रिकाधारकाने त्वरीत शिधावाटप अधिकारी/पुरवठा कार्यालयास कळवावे.

*************